## ॥मरलिन मनरोसाठी प्रार्थना॥

परमेश्वरा
स्वीकार कर ह्या मुलीला जिला साऱ्या दुनियेत
मरलिन मनरो म्हटलं जात होतं

वास्तविक तिचं नाव हे नव्हतं
(परंतु परमेश्वरा, तू जाणतोस तिचं खरं नाव
त्या अनाथ मुलीचं जी वयाच्या अवघ्या नवव्या वर्षी बलात्काराची शिकार झाली,
दुकानात नोकरी करणारी ती मुलगी, जिने सोळाव्यात
आत्महत्त्येचा प्रयत्न केला होता.)

आणि जी आता जात आहे आपल्या सेवेत विना मेकअप
विना आपल्या छायाचित्रं, विना कोणता आटोग्राफ नोंदवता
एकाकी, जसा कोणी अंतरिक्षयात्री जातो
अनंताच्या अंध:कारात

जेव्हा ती छोटी होती, तिनं स्वप्नात पाहिलं
('टाईम' नियतकालिकानुसार)
की, ती एका चर्चमध्ये नग्न उभी आहे.
जमिनीवर लोटणाऱ्या अपार गर्दीच्यासमोर
आणि लोकांची डोकी वाचवण्यासाठी
तिला चालावं लागतंय पंजाच्या बळावर

मानसिक चिकित्सकांपेक्षा चांगल्या रितीने जाणतोस
चर्च, घर किंवा गुंफा, सर्वच्या सर्व गर्भाशयाच्या सुरक्षिततेची प्रतीकं आहेत.
नव्हे त्याहूनही अधिक काही आहेत.....
हे तर स्वच्छ आहे की ही प्रशंसकांची डोकी आहेत (पडद्यावर जाणाऱ्या प्रकाशकिरणांच्या
तिरिपीखाली अंधारात मारलेली तमाम डोकी)
परंतु मंदिर ट्वेंटिएथ सेंचुरी फॉक्सचा स्टुडिओ नाहीये
सोने आणि संगमरवराचे हे मंदिर
तिच्या देहाचे मंदिर आहे जिथे आदमचा बेटा
हातात चाबुक घेऊन उभा आहे.
ट्वेंटिएथ सेंचुरी फॉक्सच्या बनियांना उकरत
ज्यांनी परमेश्वरा, तुझ्या प्रार्थनाघराला
चोरांच्या अड्ड्यात बदलून टाकले आहे.

परमेश्वरा,
अशा ह्या जगात रेडिओॲक्टिविटी आणि पाप यांच्यापेक्षा
अपवित्र, तू निश्चितच दुकानावर बसणाऱ्या
त्या मुलीला दोष देणार नाहीस
जिने (अशा कोणत्याही मुलीसारखे)
स्टार बनण्याचे स्वप्न पाहिले होते
आणि जिचे स्वप्न वास्तव बनले
(एक टेक्नीकलर वास्तव)

प्रकाशक, कलादिग्दर्शन, अक्षरलेखन : भालचंद्र कुवळ
मूळ निकारागुवा कवी : एर्नेस्तो कार्देनाल यांच्या मंगलेश डबराल कृत हिंदी भाषांतराचे मराठी
भाषांतर:
मंगेश वनसोड

आम्ही आमच्या जीवनाची
जी पटकथा तिला दिली त्यावर
ती चालत राहिली एवढंच तिनं केलं परंतु त्यांत काही अर्थ नव्हता
क्षमा कर परमेश्वरा तिला आणि क्षमा कर आम्हा सर्वांना
आपल्या या ट्वेंटिएथ सेंच्युरीसाठी
आणि त्या विशाल सुपर प्रॉडक्शनसाठी-
ज्याच्या निर्मितीत आम्ही सर्व सामील होतो.

तिला प्रेम हवं होतं आणि आम्ही तिला झोपेच्या गोळ्या दिल्या
तिला दु:ख होतं आम्ही संत होत नाही याचं आणि तिच्यासाठी सूचविल्या गेल्या
मनोविश्लेषणाच्या उपाययोजना



आठवण कर परमेश्वरा, कशी ती कॅमेऱ्याला भ्यायला लागली
कशी मेकअपबद्दल तिची घृणा वाढत गेली
(आणि तरीही प्रत्येक दृष्यात ताजे मेकअप करण्याची तिची जिद्द)

कशी वाढली तिची बंडखोरी
आणि कशी होत गेली ती स्टुडियोत पोहचण्यात बेजबाबदार

दुकानात नोकरी करणाऱ्या कोणत्याही मुलीसारखे
तिने स्टार बनण्याचे स्वप्न पाहिले होते
आणि तिचे जीवन तितकेच अवास्तव होते जितके
एखादे स्वप्न ज्याची तपासणी मनोविश्लेषक
करतो आणि आपला रिपोर्ट बनवतो.

तिचं सर्व प्रेम डोळे झाकून दिलेलं चुंबन होतं
जे प्रखर स्पॉटलाईटांच्या खाली केलं होतं
हे डोळे उघडल्यावरच लक्षात येतं
स्पॉटलाईटस् विझले आहेत
आणि खोलीच्या दोन्ही भिंती (जे एक्झीट होतं) उखडल्या गेल्या आहेत.
आणि हातात नोटबुक घेऊन दिग्दर्शक जात आहे
दृष्य ठीकठाक चित्रित केल्यानंतर
किंवा मग तिची प्रेमं एखाद्या नौकाविहारासारखी होती

एक चुंबन सिंगापूरात, एक नृत्य रियोत
एक उत्सव विंडसरचे ड्युक आणि डचेसच्या महालात
एक स्वस्त फ्लॅटच्या अशुभ तडकभडकपणात फिल्मित केलेले...

चित्रपट संपला शेवटच्या चुंबनाशिवायच
त्यांनी तिला आपल्या बिछान्यावर मेलेली पाहिली
हातात टेलिफोन घेतलेली
गुप्तहेरांना कधीच समजू शकलं नाही ती कुणाशी बोलू इच्छित होती
वाटत होतं जसा कुणी
एकमेव दोस्त आवाजाला फोन लावला आहे
आणि इकडून मात्र ऐकू आला आधीपासूनच टेप केलेला
भलताच आवाज: 'रॉंग नंबर!'

किंवा जशी डाकूंच्या हल्ल्यात घायाळ झालेली व्यक्ती
धावतेय आधीच कांटलेल्या एखाद्या फोनकडे

परमेश्वरा तो कोणीही असू दे
ज्याला ती फोनवरून बोलवायला जात होती
परंतु नाही बोलावू शकली (आणि कदाचित तो कोणीही नव्हता
किंवा कोणी होता त्याचं नाव लॉस एंजेलिसच्या टेलिफोन पुस्तिकेत
नोंदले गेले नाहीय.)

परमेश्वरा, तूच त्या फोनचे उत्तर दे.

## ॥मरलिन मनरोसाठी प्रार्थना॥

परमेश्वरा
स्वीकार कर ह्या मुलीला जिला साऱ्या दुनियेत
मरलिन मनरो म्हटलं जात होतं

वास्तविक तिचं नाव हे नव्हतं
(परंतु परमेश्वरा, तू जाणतोस तिचं खरं नाव
त्या अनाथ मुलीचं जी वयाच्या अवघ्या नवव्या वर्षी बलात्काराची शिकार झाली,
दुकानात नोकरी करणारी ती मुलगी, जिने सोळाव्यात
आत्महत्येचा प्रयत्न केला होता.)

आणि जी आता जात आहे आपल्या सेवेत विना मेकअप
विना आपल्या छायाचित्रं, विना कोणता आटोग्राफ नोंदवता
एकाकी, जसा कोणी अंतरिक्षयात्री जातो
अनंताच्या अंध:कारात

जेव्हा ती छोटी होती, तिनं स्वप्नात पाहिलं
('टाईम' नियतकालिकानुसार)
की, ती एका चर्चमध्ये नग्न उभी आहे.
जमिनीवर लोटणाऱ्या अपार गर्दीच्यासमोर
आणि लोकांची डोकी वाचवण्यासाठी
तिला चालावं लागतंय पंजाच्या बळावर
परमेश्वरा, तूच आमच्या स्वप्नांना
मानसिक चिकित्सकांपेक्षा चांगल्या रितीने जाणतोस
चर्च, घर किंवा गुंफा, सर्वच्या सर्व गर्भाशयाच्या सुरक्षिततेची प्रतीकं आहेत.
नव्हे त्याहूनही अधिक काही आहेत.....
हे तर स्वच्छ आहे की ही प्रशंसकांची डोकी आहेत (पडद्यावर जाणाऱ्या प्रकाशकिरणांच्या
तिरपीखाली अंधारात मारलेली तमाम डोकी)
परंतु मंदिर ट्वेंटिएथ सेंचुरी फॉक्सचा स्टुडिओ नाहीये
सोने आणि संगमरवराचे हे मंदिर
तिच्या देहाचे मंदिर आहे जिथे आदमचा बेटा
हातात चाबुक घेऊन उभा आहे.
ट्वेंटिएथ सेंचुरी फॉक्सच्या बनियांना उकरत
ज्यांनी परमेश्वरा, तुझ्या प्रार्थनाघराला
चोरांच्या अड्ड्यात बदलून टाकले आहे.

परमेश्वरा,
अशा ह्या जगात रेडिओॲक्टिविटी आणि पाप यांच्यापेक्षा
अपवित्र, तू निश्चितच दुकानावर बसणाऱ्या
त्या मुलीला दोष देणार नाहीस
जिने (अशा कोणत्याही मुलीसारखे)
स्टार बनण्याचे स्वप्न पाहिले होते
आणि जिचे स्वप्न वास्तव बनले
(एक टेक्नीकलर वास्तव)

आम्ही आमच्या जीवनाची
जी पटकथा तिला दिली त्यावर
ती चालत राहिली एवढंच तिनं केलं परंतु त्यांत काही अर्थ नव्हता
क्षमा कर परमेश्वरा तिला आणि क्षमा कर आम्हा सर्वांना
आपल्या या ट्वेंटिएथ सेंच्युरीसाठी
आणि त्या विशाल सुपर प्रॉडक्शनसाठी-
ज्याच्या निर्मितीत आम्ही सर्व सामील होतो.

तिला प्रेम हवं होतं आणि आम्ही तिला झोपेच्या गोळ्या दिल्या
तिला दु:ख होतं आम्ही संत होत नाही याचं आणि तिच्यासाठी सूचविल्या गेल्या
मनोविश्लेषणाच्या उपाययोजना



आठवण कर परमेश्वरा, कशी ती कॅमेऱ्याला भ्यायला लागली
कशी मेकअपबद्दल तिची घृणा वाढत गेली
(आणि तरीही प्रत्येक दृष्यात ताजे मेकअप करण्याची तिची जिद्द)

कशी वाढली तिची बंडखोरी
आणि कशी होत गेली ती स्टुडियोत पोहचण्यात बेजबाबदार

दुकानात नोकरी करणाऱ्या कोणत्याही मुलीसारखे
तिने स्टार बनण्याचे स्वप्न पाहिले होते
आणि तिचे जीवन तितकेच अवास्तव होते जितके
एखादे स्वप्न ज्याची तपासणी मनोविश्लेषक
करतो आणि आपला रिपोर्ट बनवतो.

तिचं सर्व प्रेम डोळे झाकून दिलेलं चुंबन होतं
जे प्रखर स्पॉटलाईटांच्या खाली केलं होतं
हे डोळे उघडल्यावरच लक्षात येतं
स्पॉटलाईटस् विझले आहेत
आणि खोलीच्या दोन्ही भिंती (जे एक्झीट होतं) उखडल्या गेल्या आहेत.
आणि हातात नोटबुक घेऊन दिग्दर्शक जात आहे
दृष्य ठीकठाक चित्रित केल्यानंतर
किंवा मग तिची प्रेमं एखाद्या नौकाविहारासारखी होती

एक चुंबन सिंगापूरात, एक नृत्य रियोत
एक उत्सव विंडसरचे ड्युक आणि डचेसच्या महालात
एक स्वस्त फ्लॅटच्या अशुभ तडकभडकपणात फिल्मित केलेले...

चित्रपट संपला शेवटच्या चुंबनाशिवायच
त्यांनी तिला आपल्या बिछान्यावर मेलेली पाहिली
हातात टेलिफोन घेतलेली
गुप्तहेरांना कधीच समजू शकलं नाही ती कुणाशी बोलू इच्छित होती
वाटत होतं जसा कुणी
एकमेव दोस्त आवाजाला फोन लावला आहे
आणि इकडून मात्र ऐकू आला आधीपासूनच टेप केलेला
भलताच आवाज: 'रॉंग नंबर!'

किंवा जशी डाकूंच्या हल्ल्यात घायाळ झालेली व्यक्ती
धावतेय आधीच कांटलेल्या एखाद्या फोनकडे

परमेश्वरा तो कोणीही असू दे
ज्याला ती फोनवरून बोलवायला जात होती
परंतु नाही बोलावू शकली (आणि कदाचित तो कोणीही नव्हता
किंवा कोणी होता त्याचं नाव लॉस एंजेलिसच्या टेलिफोन पुस्तिकेत
नोंदले गेले नाहीय.)

परमेश्वरा, तूच त्या फोनचे उत्तर दे.

प्रकाशक, कलादिग्दर्शन, अक्षरलेखन : भालचंद्र कुवल
मूळ निकारागुवा कवी : एर्नेस्तो कार्देनल यांच्या मंगलेश डबराल कृत हिंदी भाषांतराचे मराठी
भाषांतर:
मंगेश वनसोड